**सर्वांसाठी पाणी - टंचाई मुक्त महाराष्ट्र - २०१९ अंतर्गत राबविण्यात येणा-या "जलयुक्त शिवार अभियान" कार्यक्रमासाठी जिल्हा वार्षिक योजनेतून व आमदार स्थनिक विकास निधीतून निधी उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डिएपी-२०१५/ प्र.क्र.२३ /का.१४८१,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

तारीखः ११ मार्च, २०१५

वाचा —

१) शासन निर्णय क्रमांकः नियोजन विभाग, क्र.स्थाविका-२००७/प्र.क्र.४७/का.१४८२, दि. १३/९/२०११

२) शासन निर्णय क्रमांकः नियोजन विभाग, क्र.डिएपी-१०१४/प्र.क्र.१९८/का.१४८१, दि. २७/८/२०१४.

३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.जलअ-२०१४/क्र.क्र.२०३/ जल-७, दि. ७/१२/२०१४.

प्रस्तावना —

राज्यातील बहुतांश भाग कोरडवाहू व अवर्षणप्रवण असून, गेल्या काही वर्षामध्ये टंचाई परिस्थिती वारंवार उद्भवत आहे. त्यामुळे राज्यातील पाणी टंचाईच्या परिस्थितीवर मात करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्यासंदर्भात, "सर्वांसाठी पाणी - टंचाई मुक्त महाराष्ट्र २०१९" करण्यासाठी व टंचाई परिस्थितीवर कायम स्वरुपी मात करण्यासाठी एकात्मिक पध्दतीने नियोजनबध्दरित्या कृती आराखडा तयार करुन, पाण्याची उपलब्धता वाढविण्यासाठी "जलयुक्त शिवार अभियान" राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यामध्ये विविध विभागांतर्गत मंजूर असलेल्या मंजूर निधीतून एककेंद्राभिमुखता (Convergence) करुन MREGS / आमदार / खासदार /जिल्हास्तरीय निधी /अशासकीय संस्था /CSR लोकसहभाग इत्यादींच्या माध्यमातून टंचाई परिस्थितीवर कायम स्वरुपी मात करण्यासाठी सदर जलयुक्त शिवार अभियान सन २०१९ पर्यंत राबविण्यात येणार आहे.

२. "जलयुक्त शिवार अभियान" या कार्यक्रमाबाबतच्या शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, दि.५/१२/२०१४ मधील परिच्छेद क्र.१४ अनुसार, त्यातील नमूद विविध बाबींसाठी

जिल्हा वार्षिक योजनेमध्ये राबविण्यात येणाऱ्या नाविन्यपूर्ण योजनेचा निधी वापरण्यास मान्यता देण्यात आली आहे.

३. जलयुक्त शिवार कार्यक्रमासाठी जिल्हा नियोजन विकास समितीच्या माध्यमातून जिल्हानिहाय उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या एकूण निधीपैकी काही प्रमाणात निधी जलयुक्त शिवार अभियानासाठी वापरण्यास मुभा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. तसेच संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णय, नियोजन विभाग, दि.२७/८/२०१४ अन्वये, सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेतील निधी वाटप / निधी विनियोगाबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्याचबरोबर एखाद्या जिल्हयात अतिवृष्टी, गारपीट, पूरपरिस्थिती अथवा टंचाई परिस्थिती उद्भवल्यास अशा परिस्थितीत करावयाच्या अत्यंत तातडीच्या उपाययोजनांकरिता नियमित योजनांसाठी अनुज्ञेय असलेल्या ९५% निधीतून पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करून देण्यासाठी मुभा देण्यात आली आहे.

५. वरील पार्श्वभूमीवर, जलयुक्त शिवार अभियान कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी जिल्हा वार्षिक योजनेतून काही प्रमाणात निधी वापरण्यास मुभा देण्याची तसेच जिल्हा वार्षिक योजना व आमदार स्थानिक विकास कार्यक्रमा अंतर्गत अस्तित्वांत असलेल्या लघुपाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे यांच्या देखभाल व दुरूस्तीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय—**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, दि. ५/१२/२०१४ च्या परिच्छेद क्र. ४ मधील नमूद जिल्हास्तरीय समिती कडून या निधीतून करावयाच्या कामांची निवड करून, त्यांना मान्यता दिल्यानंतर व कृती आराखडा तयार केल्यानंतर त्या बाबतचा प्रस्ताव जिल्हा नियोजन समितीला प्राप्त झाल्यावर त्या कामांना जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने जिल्हाधिकारी यांच्याकडून खालीलप्रमाणे निधी उपलब्ध करून देता येईल:-

**(अ)** संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णय, नियोजन विभाग, दि.२७/८/२०१४ अन्वये, टंचाई परिस्थितीत करावयाच्या तातडीच्या उपाययोजनांसाठी मा. पालकमंत्री यांच्या मान्यतेने अनुज्ञेय असलेला ५% निधी सन २०१८-१९ पर्यंत "जलयुक्त शिवार अभियान" या कार्यक्रमाअंतर्गत राबवावयाच्या विविध बाबींसाठी वापरण्याची मुभा राहील.

**(ब)** जिल्हा वार्षिक योजनेतील नियमित योजनांसाठी उपलब्ध असलेल्या निधीतून वरील अ.क्र. (१) व्यतिरिक्त अधिकचा ५% निधी जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने सन २०१८-१९ पर्यंत "जलयुक्त शिवार अभियान" या कार्यक्रमाअंतर्गत राबवावयाच्या विविध बाबींसाठी वापरण्याची मुभा राहील.

२. (अ) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, दि.५/१२/२०१४ मधील परिच्छेद क्र.४ अन्वये, गठीत केलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सदर शासन निर्णयातील अनुज्ञेय केलेल्या कामांची निवड करून व त्यांना मान्यता देऊन कृती आराखडा तयार केल्यावर, जलयुक्त शिवार अभियानाचे महत्व व उपयुक्तता लक्षांत घेता सदर अभियानातील अंतर्भूत असलेल्या गावांपुरते जिल्हा नियोजन समितींकडून लघुपाटबंधारे योजना व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे या योजनांसाठी जिल्हा परिषदांना देण्यात येणाऱ्या निधीतून सन २०१८-१९ पर्यंत सदर योजनांच्या देखभाल व दुरूस्ती यासाठी खर्च करण्याची मुभा राहील. **मात्र, सदर मुभा जिल्हा वार्षिक योजनेच्या नियमित योजनेतील कामांच्या देखभाल व दुरूस्तीसाठी अनुज्ञेय असणार नाही.** तसेच, सदर कार्यक्रमाअंतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांच्या कामनिहाय स्वतंत्र नोंदी ठेवण्यात याव्यात. तसेच देखभाल व दुरूस्तीवरील खर्च संबंधित शिर्षाखालील उपलब्ध तरतूदीच्या १०% पर्यंत मर्यादित असावा.

(ब) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, दि.५/१२/२०१४ मधील परिच्छेद क्र.४ अन्वये, गठीत केलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सदर शासन निर्णयातील अनुज्ञेय केलेल्या कामांची निवड करून व त्यांना मान्यता देऊन कृती आराखडा तयार केल्यावर तसेच त्या बाबतचा प्रस्ताव जिल्हा नियोजन समितीला सादर झाल्यावर त्यास जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने जिल्हाधिकारी यांच्यामार्फत जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत राबविण्यात येणाऱ्या नाविन्यपूर्ण योजनासाठीच्या ३.५% नियतव्यया मधुन निधी उपलब्ध करून देण्याची मुभा राहील.

३. आमदार स्थनिक विकास कार्यक्रमामधुन ₹२०.०० लक्ष मर्यादेपर्यंत अनुज्ञेय असलेल्या कोल्हापूर पध्दतीचे बंधारे, लघुपाटबंधारे योजना, वळण बंधारे, वनराई बंधारे आणि अन्य सर्व प्रकारच्या लघुपाटबंधारे कामांच्या नवीन कामांबरोबर या सर्व कामांसाठी "देखभाल व दुरूस्ती" या बाबींवरही सन २०१५-१६ ते २०१८-१९ या कालावधीपुरता खर्च करण्याची मुभा राहील.

४. उपरोक्त शासन निर्णय, दि.५/१२/२०१४ च्या परिच्छेद क्र.६ व १४ मध्ये नमूद केलेली कामे हाती घेण्याचे अधिकार उपरोक्त शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.४ अन्वये गठीत केलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीस असुन सदर कामांची छाननी करून त्यांना प्रशासकिय मान्यता देण्याचे अधिकारही सदर समितीस राहतील.

५. "जलयुक्त शिवार अभियान" संदर्भात मुल्यमापन, संनियंत्रण, प्रगती अहवाल, समन्वय इत्यादी बाबतची कार्यवाही शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, दि.५/१२/२०१४ मध्ये विषद केल्यानुसार करण्यात येईल.

६. जलयुक्त शिवार कार्यक्रमातील उपाययोजनांसाठी करण्यात येणारा खर्च जलसंधारणाशी संबंधित असलेल्या नियमित योजनांच्या लेखाशिर्षामधुन अथवा "४५१५-इतर जिल्हा योजना" या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११७०६५६३०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2015.03.12 10:51:30 +05'30'

**( अ.शि. बेळगुद्री )**

शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
५. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद सदस्य,
६. मा. राज्यमंत्री (नियोजन)
७. सर्व मा. मंत्री, राज्यमंत्री यांचे खजगी सचिव,

८. मा. मुख्य सचिव,
९. प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
१०.सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई .
११.आयुक्त (कृषी ), कषी आयुक्तालय, पुणे,
१२.प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर
१४.महालेखापाल महाराष्ट्र- १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), नमुंबई / नागपूर
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८.सर्व मंत्रालयीन प्रशासकिय विभाग
१९.सर्व विभागीय आयुक्त,
२०.सदस्य सचिव, मराठवाडा विकास मंडळ, औरंगाबाद,
२१.सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ, नागपूर,
२२.सदस्य सचिव, उर्वरीत महाराष्ट्र विकास मंडळ, पुणे,
२३.सर्व जिल्हाधिकारी,
२४.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२५.नियोजन विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव,
२६.संचालक, अर्थ सांख्यिकी संचालनालय,मुंबई.
२७.सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालये,
२८.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय,
२९.सर्व कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३०.निवड नस्ती, का. १४८१, नियोजन विभाग.